मोटार अपघात दावा न्यायाधिकरण मुंबई येथील कार्यालयीन जागेची दैनंदिन साफ-सफाई कंत्राटी प्रध्दतीने करुन घेणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन आदेश क्रमांक: एमसीटी ०१०४/ प्र.क्र. २७/ परि-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १७ ऑगस्ट, २००४

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र. एमसीटी ०९०१/ ११६५/ प्र.क्र. ११७ (ब)/ परि-५, दि.२.१२.२००३.
२) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण मुंबई -
१) पत्र क्र. मोअदान्या/ आस्था/ १९/ २००४, दि.०९.१.२००४.
१) पत्र क्र. एमसीटी/ आस्था/ २७९/ २००४, दि.२४.५.२००४.

महाराष्ट्र राज्यातील मोटार वाहनांची संख्या दिवसेंदिवस वाढत असून मोटार वाहनामुळे अपघात वाढत आहेत. अपघातास बळी पडलेल्या व्यक्तिच्या कुटुंबाला किंवा जखमी झालेल्या अपघात ग्रस्तांना न्याय देण्याच्या दृष्टीने मुंबई येथे ५ मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे कार्यरत होती. अपघातात बळी पडलेल्या व्यक्तिनी किंवा अपघातात जखमी झालेल्या व्यक्तिंना तातडीने न्याय देणेच्या दृष्टीने बृहन्मुंबई परिक्षेत्रासाठी शासन निर्णय क्र. एमसीटी ०९०१/ ११६५/ प्र.क्र.११७ (ब)/ परि-५, दि.२.१२.२००३ अन्वये तीन (३) अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे व त्याअनुषंगाने ३ सदस्य व १५ कर्मचाऱ्यांची पद निर्मिती केली आहे.

बृहन्मुंबई परिक्षेत्रासाठी नव्याने स्थापन केलेली तीन अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे मा.उच्च न्यायालयाने उपलब्ध करुन दिलेल्या लघुवाद न्यायालय, धोबी तलाव मुंबई येथे कार्यरत करण्यात आली आहेत.

नवीन पद निर्मिती करतांना कार्यालयीन जागेची दैनंदिन साफसफाई करणसाठी, सफाई कामगाराचे पदाची मागणी करण्यात आली होती. परंतु पद निर्मितीमध्ये सफाई कामगाराच्या निर्मितीस मान्यता मिळाली नाही. त्यामुळे मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाने कार्यालयाचे सफाईचे दैनंदिन काम करणेसाठी सफाई कामगाराचे पद निर्मित करणेबाबत अथवा कंत्राटी पध्दतीने काम करुन घेणेबाबत संदर्भ क्र. २ दि.९.१.२००४ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

बृहन्मुंबई परिक्षेत्रासाठी नव्याने स्थापन करण्यात आलेल्या तीन अतिरिक्त न्यायाधिकरण लघुवाद न्यायालय, धोबी तलाव, मुंबई कार्यरत असून येथील न्यायधिकरणाचे ४ दालने, स्वच्छता गृहे व इतर कार्यालयीन परिसर रोजच्या रोज साफ करणेसाठी सफाई कामगारास कंत्राटी पध्दतीने नेमणूक करुन साफसफाईचे

काम करुन घेणेस व त्यासाठी दरमाह रु.३६२५/- (रुपये तीन हजार सहाशे पंचवीस फक्त) इतके वेतन देणेस शासन मंजूरी देत आहे.

तसेच बृहन्मुंबई परिक्षेत्रासाठी नव्याने स्थापन केलेल्या मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे लघुवाद न्यायालय, धोबी तलाव, मुंबई येथील कार्यालयाची साफ सफाई श्रीमती रेखा मनोहर लवाना यांनी कार्यालय स्थापन केल्यापासून म्हणजेच २.१२.२००३ पासून केले आहे. त्यामुळे श्रीमती रेखा लवाना यांना दरमहा रु.३६२५/- प्रमाणे माहे डिसेंबर २००३ ते जुलै २००४ या ८ महिन्याच्या कालावधीतील (३६२५X८) रु.२९,२००/- (रुपये एकोणतीस हजार दोनशे फक्त) इतके वेतन पूर्वलक्षीप्रभावाने प्रदान करणेस शासन मान्यता देत आहे.

यासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.ब-३, "२०४१ वाहनावरील कर, ८०० इतर खर्च ०० (०१), मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे खाली खर्ची टाकण्यात येवून तो सन २००४-२००५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारी संदर्भ क्र. ५२२/ २००४/ व्यय-८, दि.४.८.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(आ. बा. डमाळे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.